जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा- प्रशासन (केंद्र हिस्सा ६०% व राज्य हिस्सा ४०%) या योजनेचे राज्य योजनेमध्ये रुपांतर करुन १००% राज्य योजना म्हणून राबविणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जिग्राप्र-११२१/प्र.क्र-४३/योजना-५**
बांधकाम भवन,तळमजला
२५, मर्झबान पथ, फोर्ट,मुंबई-४०० ००१.
दिनांक : ०१ एप्रिल, २०२२.

**वाचा :**

१) ग्रामीण विकास मंत्रालय, भारत सरकार च्या सन २००८ च्या मार्गदर्शक सूचना.

२) ग्रा.वि.वि.,शासन निर्णय क्र.जिग्राप्र-२००३/प्र.क्र.१७४३/योजना-५, दिनांक १७.मार्च, २००४.

३) शासन पत्र क्र.जिग्राप्र-२०१९/प्र.क्र.३०/योजना-५, दिनांक १९.०७.२०१९.

४) ग्रा.वि.वि.,शासन निर्णय क्र. झेडपीए-२०२१/प्र.क्र.३५/पं.रा.१, दिनांक ०६.१०.२०२१

५) ग्रामीण विकास मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. R.२००१५/२/२०२० - DRDA (Compno .३७२७४२), दिनांक ०१.११.२०२१.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाचे वरील वाचा अ.क्र.५ पत्र क्र. R.२००१५/२/२०२० - DRDA (Comp. no. ३७२७४२) दिनांक ०१.११.२०२१ अन्वये जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा- प्रशासन योजना बंद करण्याच्या सूचना देण्यात आलेल्या असून त्यानुसार दिनांक ०१.०४.२०२२ पासून केंद्र हिस्सा (६०%) मिळणे बंद होणार आहे.

सदर योजना बंद करण्याऐवजी राज्य शासनाकडून १००% राज्य योजना म्हणून राबविण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. तसेच सदंर्भ क्र.५ च्या शासन निर्णयान्वये जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांचे पुनर्गठण व बळकटीकरण करण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे.

## शासन निर्णय:-

जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-प्रशासन योजना बंद करण्याऐवजी राज्य शासनाकडून १००% राज्य योजना म्हणून राबविण्याबाबत दिनांक ३१.०३.२०२२ रोजी मा. मंत्रीमंडळ बैठक संपन्न झाली. सदर बैठकीत खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला.

१) जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-प्रशासन योजना बंद करण्याऐवजी राज्य शासनाकडून १००% राज्य योजना म्हणून पुढील ५ वर्षे म्हणजेच दिनांक ०१.०४.२०२२ ते ३१.०३.२०२७ पर्यंत पूर्वीप्रमाणे सुरु राहील.

२) जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-प्रशासन योजनेकरीता दिनांक ०१ एप्रिल, २०२२ पासून १५ पदांऐवजी खालील ८ पदांचा आकृतीबंध मंजूर करण्यात यावा. उर्वरित पदावरील अधिकारी / कर्मचारी यांच्या सेवा त्यांच्या मूळ आस्थापनेवर प्रत्यार्पीत करण्यात याव्यात.

| अ.क्र. | पदाचे नाव | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | प्रकल्प संचालक (अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी संवर्ग) | १ |
| २ | सहायक प्रकल्प संचालक (म.वि.से. वर्ग-२) | १ |
| ३ | सहायक लेखाधिकारी (वर्ग -३) | १ |
| ४ | कार्यालय अधीक्षक | १ |
| ५ | कनिष्ठ अभियंता / शाखा अभियंता | १ |
| ६ | विस्तार अधिकारी | १ |
| ७ | वरिष्ठ सहायक | १ |
| ८ | लिपिक टंकलेखक (कनिष्ठ सहायक) | १ |
| **एकूण पदे** | | ८ |

३) जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा - प्रशासन योजनेकरीता सन २०२२-२३ या आर्थिक वर्षामध्ये रुपये ३६.७२ कोटी इतक्या निधीची तरतूद करण्यात यावी.

४) सदंर्भ क्र. ४ च्या शासन निर्णयान्वये जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा बळकटीकरणाबाबत स्वतंत्र आदेश निर्गमित करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०४०४१६०९४९३३२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ARUN VASANT SHINDE

Digitally signed by ARUN VASANT SHINDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=213d983c0c3b73519fa14c37396dd0b3cf8f28e16bc2fb6620a5c4fdac6e7284, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=672D36CC7468AA812E66DBB4704FFEB120DD58831284824F4FBEC2A6F6602199, cn=ARUN VASANT SHINDE
Date: 2022.04.04 16:54:21 +05'30'

**(अरुण व. शिंदे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अ.मु.स./प्र.स./सचिव, नियोजन विभाग मंत्रालय, मुंबई.
२. अ.मु.स./प्र.स./सचिव (व्यय-१५/अर्थसंकल्प-१७/कोषा-प्रशा-४) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. महालेखापाल (लेखापरिक्षा) महाराष्ट्र-१/२ मुंबई/नागपूर.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२ मुंबई/नागपूर.
५. मुख्य कार्यकारी अधिकारी , उमेद - महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, ५ वा मजला, सिडको भवन, दक्षिण विंग, बेलापूर, नवी मुंबई
६. वित्तीय नियंत्रक तथा उप सचिव, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, मुंबई.
७. अतिरिक्त संचालक,प्रकल्प आखणी व एकात्मिक ग्रामीण विकास कार्यक्रम कक्ष.
८. संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष, ग्रामीण गृहनिर्माण, नवी मुंबई.
९. विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय, (सर्व).
१०. मु.का.अ., जि.प.तथा अध्यक्ष, कार्यकारी समिती, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा,(सर्व).
११. जिल्हाधिकारी (मुंबई व मुंबई उपनगर वगळून), (सर्व).
१२. प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, (सर्व).
१३. कक्ष अधिकारी (वित्त-१), ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, मर्झबान रोड,मुंबई.
१४. जिल्हा कोषागार अधिकारी, (सर्व).
१५. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
१६. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय,महाराष्ट्र राज्य मुंबई.
१७. निवड नस्ती, कार्यासन योजना-५.